(१८६)

201504221233208327

सडे कोल्हापूर पध्दतीचा बंधारा
ता. कोपरगांव, जि. अहमदनगर योजनेस
सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्र. कोपबं- २००२/८३७/(१५७/०२)/खारभूमि**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक:** २१/६/२००६

**पहावे-** १) मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, उत्तर महाराष्ट्र प्रदेश, नाशिक यांचा दि. २६/३/२००२ चा जावक क्र. उमप्र/तां-३/१४७६/सन २००२ अन्वये प्राप्त झालेला प्रस्ताव.

**प्रस्तावना:**

अहमदनगर जिल्ह्याच्या कोपरगांव तालुक्यातील सडे कोल्हापूर पध्दतीच्या बंधाऱ्याच्या कामास शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्रमांक कोपबं/२४९०/१३१०/(४२८/९०)/लपा-१, दिनांक ९/१/९१ अन्वये एकूण रु. १८७.४० लक्ष इतक्या रकमेस नव्याने प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती.

योजनेचे बांधकाम करण्यासाठी शासनाच्या संमतीने दिनांक ६/७/९३ रोजी १) संजीवनी सहकारी साखर कारखाना २) कोपरगांव सहकारी साखर कारखाना ३) गणेश सहकारी साखर कारखाना ता. कोपरगांव, जि. अहमदनगर यांचेबरोबर संयुक्त करारनामा करण्यात आला. कारखान्याने या योजनेचे काम पूर्ण केले असून. आजमितीस सदर तीनही बंधारे कारखान्याच्या ताब्यात आहेत. करारनाम्यानुसार भारीत मापदंडानुसार येणारी रक्कम किंवा कारखान्याने प्रत्यक्ष केलेला खर्च यापैकी जी रक्कम कमी असेल त्याची प्रतिपूर्ती पुढील पाच वर्षात पाच समान हप्त्यात कारखान्याला शासनाने करावयाची आहे. तद्नंतर या बंधाऱ्याची मालकी शासनाची होणार आहे. सध्या या बंधाऱ्याचे सिंचन व्यवस्थापन कारखाने पहात आहेत. सदर बंधाऱ्याचे काम पूर्ण झाले असून सन २०००-२००१ ची दरसूची वापरुन सुधारित अंदाजपत्रक तयार करुन रु. ४,५५,१३,३१६/- किंमतीच्या प्रकल्पास सुधारित प्रशासकीय मान्यता मिळण्याबाबतचा प्रस्ताव मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, उत्तर महाराष्ट्र प्रदेश, नाशिक यांचेकडून शासनास प्राप्त झाला होता व तो शासनाच्या विचाराधीन होता. सदर प्रस्तावासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

## शासन निर्णय :

१) अहमदनगर जिल्ह्याच्या कोपरगांव तालुक्यातील सडे कोल्हापूर पध्दतीचा बंधारा योजनेस सन २०००-२००१ वर्षाच्या दरसूचीवर आधारित सुधारित प्राक्कलनानुसार कामाच्या एकूण अंदाजित रु. ४,५५,१३,३१६/- (रु. चार कोटी, पंच्चावन्न लक्ष, तेरा हजार, तीनशे सोळा फक्त, त्यापैकी रु. ३,६३,४७,७९५/- कामाप्रीत्यर्थ व रु. ९१,६५,५२१/- आनुषंगिक खर्च) रकमेस सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. अंदाजपत्रकाचा गोषवारा सोबत जोडलेल्या विवरणपत्रात देण्यांत आला आहे.

२) या योजनेच्या कामावरील खर्च मुख्य लेखाशीर्ष "४७०२-लहान पाटबंधाऱ्यावरील भांडवली खर्च पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका (चार) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ भाग भांडवली अंशदान" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकाया व गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यांत यावा.

हा निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ७३४/१४६१, दिनांक २४/१२/२००३ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १४९/व्यय-१२, दिनांक १७/३/२००६ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यांत येत आहे.

या योजनेस प्रदान केलेली सुधारित प्रशासकीय मान्यता अ.क्र. "१०" वर नोंदविण्यात आलेली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

(श्री. ए. केदार)
शासनाचे अवर सचिव

**प्रतिलिपी अंदाजपत्रकाच्या गोषवाऱ्यासह:-**

महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा), मुंबई/नागपूर
कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद.
मुख्य अभियंता (दवप्र) व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, उत्तर महाराष्ट्र प्रदेश, नाशिक.
अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, अहमदनगर
आंतर वित्त सल्लागार व उपसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
उपसचिव (लघु पाटबंधारे) / अवर सचिव (खारभूमि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे विभाग, क्रमांक २ अहमदनगर (५ प्रती)
उपअभियंता (खारभूमि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
अर्थशाखा (३ प्रती)/लपा-१ (५ प्रती)/लपा-२/निवसं-२, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
जिल्हाधिकारी, अहमदनगर
स्वीय सहायक, मंत्री (जलसंपदा), (कृष्णा खोरे पाटबंधारे महामंडळे वगळून ) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, राज्यमंत्री (जलसंपदा), (कृष्णा खोरे पाटबंधारे महामंडळे वगळून ) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
विभागीय संपर्क अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
खारभूमि कार्यासन (संग्रहार्थ).

(दिनांक २१/६/२००६ चा शासन निर्णय, जलसंपदा विभाग क्र. कोपबं- २००२/८३७/(१५७/२००२)
खारभूमि चे सहपत्र)

विवरणपत्र

अंदाजपत्रकाचा गोषवारा

सडे कोल्हापूर पध्दतीचा बंधारा, ता. कोपरगांव जि. अहमदनगर

| अ.क्र. | उपशीर्ष | कामाची सुधारित किंमत (रुपये) | |
|---|---|---|---|
| | | (१) शीर्ष कामे | एकूण |
| १. | ए-प्राथमिक | २५,००० | २५,००० |
| २. | बी-भूसंपादन | ४८,७०० | ४८,७०० |
| ३. | सी-कामे | ३,५९,०१,३४२ | ३,५९,०१,३४२ |
| ४. | डी- विमोचक | - | - |
| ५. | इ - प्रपात | - | - |
| ६. | एफ- आरएचटी कामे | - | - |
| ७. | जी- पूल (सी. टी. क्रॉसींग) | - | - |
| ८. | एच- एस्केप | - | - |
| ९. | के- इमारती | १,५०,००० | १,५०,००० |
| १०. | एल- मातीकाम | - | - |
| ११. | एम- वृक्षारोपण | - | - |
| १२. | ओ- संकीर्ण | १०,००० | १०,००० |
| १३. | पी - देखभाल | ९२,७५३ | ९२,७५३ |
| १४. | आर-दळणवळण | १,२०,००० | १,२०,००० |
| १५. | डिस्ट्रीब्युटरी | - | - |
| | एकूण | ३,६३,४७,७९५ | ३,६३,४७,७९५ |
| | अधिक आनुषंगिक खर्च | | ९१,६५,५२१ |
| | प्रकल्पाची एकूण किंमत | | ४५५,१३,३१६ |

ठळक बाबी :

| | |
|---|---|
| योजनेची सिंचन क्षमता | १८६५ हेक्टर |
| नियोजित पाणी साठा | ७८९९ स.घ.मी. |
| पाणीसाठयाची प्रति स.घ.मी. किंमत | ५७६१ < ७६०० |
| लाभव्यय गुणोत्तर | १.५५ > १.०० |